**मा.न्या.श्री.ए.पी.भंगाळे, तत्कालीन अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांना अर्जित रजेचे रोखीकरण मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ग्रासंअ-२०२१/प्र.क्र.५०/ग्रासं-४**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दि. २४ जानेवारी, २०२२

**संदर्भ** :- १) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र, मुंबई यांचे पत्र क्र.राआ/कक्ष-१/मा.अध्यक्ष/ अररो/स्मरणपत्र/२३२४/२०००, दि.१७.१२.२०२०.
२) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र, मुंबई यांचे पत्र क्र.राआ/कक्ष-१/ मा.अध्यक्ष/ अररो/माहिती/९३९/२०२१, दि.०८.०३.२०२१.
३) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, शासन निर्णय क्र.ग्रासंक-२२०९/२८८/ प्र.क्र.४३५९/ग्रासं-३, दि.०६.०६.२००९.

**प्रस्तावना :-**

ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ अंतर्गतच्या राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या अध्यक्षपदी मा.न्या. श्री.ए.पी.भंगाळे (सेवानिवृत्त) यांची शासन निर्णय दि.०६.०१.२०१६ अन्वये नियुक्ती करण्यात आली होती. या नियुक्ती आदेशानुसार सदर नियुक्ती ५ वर्षासाठी किंवा त्यांच्या वयाची ६७ वर्षे पूर्ण होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल, तो पर्यंत राहणार होती. तसेच श्री.भंगाळे यांच्या वेतनाच्या अनुषंगाने महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम,२००० च्या नियम-७ मधील तरतुदी लागू होत्या. श्री.भंगाळे यांचा अध्यक्षपदाचा कार्यकाल दि.१८.०९.२०२० रोजी संपुष्टात आला आहे. महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम, २००० मध्ये अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग यांना अनुज्ञेय रजा व रजा रोखीकरणासंदर्भात स्वयंस्पष्ट तरतूद नाही. तथापि, संदर्भाधीन ३ येथील शासन निर्णय दि. ६.६.२००९ अन्वये श्री. वग्याणी, तत्कालीन अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग यांना रजा रोखीकरणाचा लाभ देण्यात आल्याच्या पार्श्वभूमीवर श्री.भंगाळे यांच्या अध्यक्ष पदाच्या साधारणत: एकूण ४ वर्षे ८ महिन्याच्या कालावधीतील एकूण न भोगलेल्या १४२ दिवसांच्या अर्जित रजेचे रोखीकरण मंजूर करण्याचा प्रस्ताव संदर्भ क्र.१ व २ च्या राज्य आयोगाच्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. दरम्यानच्या काळात ग्राहक संरक्षण (राज्य आयोग आणि जिल्हा मंच यांचे अध्यक्ष व सदस्य यांची नियुक्ती, वेतन ,भत्ते व सेवेच्या शर्ती) नियम, २०१९ दि. २४.५.२०१९ रोजी लागू झाल्याने महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम, २००० हे व्यपगत झाले होते. तसेच मा. न्या.श्री.भंगाळे हे अध्यक्ष ,राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग या पदावर कार्यरत असताना ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ व्यपगत झाला व दि. २०.७.२०२० पासून ग्राहक संरक्षण अधिनियम, २०१९ आस्तित्वात येऊन त्याच्या तरतूदी लागू झाल्या. ग्राहक संरक्षण अधिनियम ,२०१९ अंतर्गत केंद्र शासनाने तयार केलेले Consumer Protection (Salary, allowances and condition of service of President and members of the State Commission and District Commission) Model Rules, २०२० हे दि. २०.७.२०२० पासून लागू झाले. मा. न्या. श्री. भंगाळे यांनी अध्यक्ष , राज्य आयोग या पदावर एकूण दि.११.१.२०१६ ते दि.१८.९.२० २० या कालावधीत काम केले आहे. उपरोक्त परिस्थीत मा.न्या.श्री.भंगाळे यांना रजा रोखीकरण मंजूर करता येईल किंवा कसे याबाबत विधी व न्याय विभागाचे अभिप्राय प्राप्त करून घेण्यात आले. विधी व न्याय विभागाचे अभिप्राय विचारात घेता मा. न्या.श्री. भंगाळे यांना त्यांच्या अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग या पदाच्या सेवा कालावधीत अदा करावयाच्या रजा रोखीकरणाच्या लाभासंदर्भात खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णयः-**

मा. न्या. श्री. ए.पी. भंगाळे, तत्कालीन अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग यांच्या अध्यक्षपदाच्या दि.११.१.२०१६ ते दि. १८.९.२०२० या कालावधीपैकी दि. २०.७.२०२० ते दि. १८.९.२०२० या कालावधीत अनुज्ञेय रजांपैकी न भोगलेल्या अर्जित रजेच्या अनुषंगाने रजा रोखीकरणाचा लाभ सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येत आहे. सदर लाभाची गणना त्यांचे दि.१८.९.२०२० रोजीचे अनुज्ञेय मूळ वेतन व त्यावर अनुज्ञेय महागाई दरानुसार करण्यात यावी. या रोख रकमेत स्थानिक पूरक भत्ता व घरभाडे भत्ता यांचा समावेश असणार नाही.

उपरोक्त बाबीसाठी होणारा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र. एम-२, मुख्य लेखाशिर्ष २४०८, अन्न, साठवण व वखार, १०१, प्रापण व पुरवठा, (०४) ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ अन्वये राज्य परिषद, राज्य आयोग व जिल्हा मंच स्थापन करणे, (०४) (०१) मुंबई शहर, (२४०८ ०२५१), (दत्तमत) (अनिर्वाय) १०, कंत्राटी सेवा या अंतर्गतच्या अर्थसंकल्पित तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२४१६०७५९४२०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Katikar
Padmavati

Digitally signed by Katikar Padmavati
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a8ad7b53d0557c046089b7688f952dd3fa64ce328691d88242bbde043cba86c, serialNumber=ec2d6c76e02d91ee9f71efe012213ab98a56fdcc6bffb5ce4ef3fafa682eb741, cn=Katikar Padmavati
Date: 2022.01.24 16:09:11 +05'30'

**( पद्मावती काटीकर )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, यांचे प्रधान सचिव.
२) मा.मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा. मंत्री, वित्त विभाग,मंत्रालय यांचे खाजगी सचिव.
४) मा. मंत्री, ( अ.ना.पु व ग्रा.सं.),मंत्रालय,मुंबई यांचे खाजगी सचिव
५) मा. राज्यमंत्री ( अ.ना.पु व ग्रा.सं.) मंत्रालय,मुंबई यांचे खाजगी सचिव
६) मा. अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र, मुंबई
७) मा. न्या. श्री. ए.पी. भंगाळे, तत्कालीन अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
८) अ.मु.स. (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव, ( अ.ना.पु व ग्रा.सं.), मंत्रालय, मुंबई.
१०) अधिदान व लेखा कार्यालय,मुंबई
११) प्रबंधक, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
१२) निवडनस्ती/ग्रासं-४.